आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित प्रकल्पासाठी नियुक्त प्रकल्प अंमलबजावणी सहाय्यक सल्लागार (PISC) वरील सनियंत्रणासाठी समिती गठीत करण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक:** मुग्रायो-२०१९/प्र.क्र.२५३/बांधकाम-४
५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: ०९ फेब्रुवारी, २०२२

**वाचा:**

**ग्राम विकास विभाग, शासनपत्रक्रमांकः**मुग्रायो-२०१९/प्र.क्र.२५३/बांधकाम-४, दिनांक २३ जून, २०२१

**शासन परिपत्रक :**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत आशियाई विकास बँक अर्थसहाय्यित प्रकल्पासाठी प्रकल्प अंमलबजावणी सहाय्यक सल्लागार म्हणून मे.एल.एन.मालवीय इन्फ्रा प्राय. लि,भोपाळ, यांच्या रू.४२.२८ कोटी इतक्या निविदा रकमेस उपरोक्त वाचा मधील दिनांक २३ जून, २०२१ अन्वये मान्यता देण्यात आली असून, त्यानुसार मुख्य अभियंता तथा प्रकल्प उपसंचालक यांनी त्याप्रमाणे संबंधित सल्लागाराशी करारनामा केलेला असून, त्याअंतर्गत प्रकल्प अंमलबजावणी सहाय्यक सल्लागाराची नियुक्ती करण्यात आली आहे.

०२. प्रकल्प अंमलबजावणी सहाय्यक सल्लागार यांनी निविदेत नमुद केल्यानुसार विविध तज्ञांची नियुक्ती करणे बंधनकारक आहे. तसेच, मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतील आशियाई विकास बँक अर्थसहाय्यित रस्त्यांच्या बाबत संबंधित नागरिकांच्या जीवनमान, आर्थिक व सामाजिक प्रगती तसेच पर्यावरणीयदृष्टया झालेल्या बदलांचा संबंधित तज्ञांनी अभ्यास करून त्याप्रमाणे अहवाल वेळोवेळी आशियाई विकास बँक ला सादर करणे अपेक्षित आहे.

०३. प्रकल्प अंमलबजावणी सहाय्यक सल्लागार यांचे अंतर्गत नियुक्त तज्ञांकडून निविदेतील नमुद वावानुसार कामाचे सनियंत्रण करण्याकरिता मुख्य अभियंता, (प्रं.म.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे समिती नियुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संबंधित अधिकारी | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.),महाराष्ट्र ग्रामीण रस्ते | अध्यक्ष |

| अ.क्र. | संबंधित अधिकारी | समितीतील पद |
|---|---|---|
| | विकास संस्था, पुणे | |
| २ | अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,पुणे विभाग, पुणे | सदस्य |
| ३ | अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,कोकण विभाग, ठाणे | सदस्य |
| ४ | कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जिल्हा ठाणे | सदस्य सचिव |

०४. उपरोक्त प्रमाणे स्थापन करण्यात आलेल्या समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल-:

१. प्रकल्प अंमलबजावणी सहाय्यक सल्लागार अंतर्गत नियुक्त अधिकारी/अभियंता/तज्ञ व्यक्तींच्या कामांवर सनियंत्रण ठेवणे.

२. आशियाई विकास बँक यांना सादर करावयाचे अहवाल विहित मुदतीत सादर करण्याबाबतचे सनियंत्रण करणे.

३. प्रकल्प अंमलबजावणी सहाय्यक सल्लागार यांचे कडील कामांवर प्रभावीपणे सनियंत्रण ठेवण्याच्या अनुषंगाने आवश्यकतेनुसार बैठकीचे आयोजन करणे तसेच या संदर्भात वेळोवेळी उद्भवणाऱ्या अडचणींबाबत वेळोवेळी आढावा घेवून त्याप्रमाणे निराकरण करणे.

४. प्रकल्प अंमलबजावणी सहाय्यक सल्लागार यांचे कडून प्राप्त देयकांबाबत, देयक अदा करण्यापूर्वी निविदेतील तरतुदीनुसार तपासून देयक अदा करण्याबाबत शिफारस करणे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०९१७१५४८७६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2022.02.09 17:52:31 +05'30'

**(प्रविण जैन)**

**वित्तीय नियंत्रक तथा उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
२. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व विभाग.
५. कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व जिल्हे.
६. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. मा.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.